कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता यंत्रणेतील गट-क संवर्गातील कर्मचाऱ्यांच्या स्व-विनंतीने बदल्या-२०२१.

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य विकास,रोजगार व उद्योजकता विभाग**
**क्रमांक : बदली-२०२१/प्र.क्र.१२४/प्रशा-२ (रोजगार),**
मंत्रालय (मुख्य इमारत), दालन क्र.२०४, २ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २९ डिसेंबर, २०२१.

संदर्भ : आयुक्तालयाचे क्रमांक कौविरोवउआ-२/आस्था/अराप/(१४/२१)/२५२, दिनांक २८ जुलै, २०२१ चे पत्र

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांचे बदल्यांचे विनीयमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४(४) व (५) मधील तरतुदीनुसार बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता यंत्रणेतील गट-क संवर्गातील श्री.रुपेश बळीराम शिंदे, लिपीक टंकलेखक, जिल्हा कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता मार्गदर्शन केंद्र, मुंबई उपनगर यांची बदली कौशल्य विकास,रोजगार व उद्योजकता विभागीय मुख्यालय, नाशिक तसेच श्री.जयदत्त इंगोले, लिपीक टंकलेखक, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता आयुक्तालय, नवीमुंबई यांची बदली जिल्हा कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता मार्गदर्शन केंद्र, बीड येथे त्यांच्या विनंतीनुसार करण्यात येत आहे.

२. श्री.रुपेश बळीराम शिंदे तसेच श्री.जयदत्त इंगोले यांनी नवीन पदाचा कार्यभार त्वरीत स्विकारावा व आपला पदग्रहण अहवाल शासनास विनाविलंब शासनास सादर करावा. उपरोक्त लिपीक टंकलेखक यांनी दिलेल्या पदग्रहण अवधीतच, बदली झालेल्या लिपीक टंकलेखक यांनी बदलीच्या ठिकाणी रुजू होण्याची दक्षता घ्यावी, अन्यथा या पदग्रहण अवधीत बदलीच्या पदावर रुजू न झाल्यास, त्यांचा अनुपस्थितीचा कालावधी हा अकार्यदिन (dies non) म्हणून गणला जाईल. तसेच त्यांचे लक्ष महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक ) नियम, १९७९, मधील नियम २३ कडे वेधण्यात येत आहे. सदर नियमातील तरतूदी लक्षात घेता, त्यांनी पदस्थापनेत बदली करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील.

३. श्री.रुपेश बळीराम शिंदे,लिपीक टंकलेखक तसेच श्री.जयदत्त इंगोले, लिपीक टंकलेखक यांच्या बदल्या त्यांच्या विनंतीनुसार करण्यात येत असल्याने त्यांना महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियमानुसार पदग्रहण अवधी, प्रवास भत्ता व दैनिक भत्ता इ.देय राहणार नाही.

४. सबंधित नियंत्रण अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, श्री.रुपेश बळीराम शिंदे तसेच श्री.जयदत्त इंगोले यांना नवीन नियुक्तीच्या ठिकाणी कार्यभार घेता यावा म्हणून आवश्यक ती स्थानिक पर्यायी व्यवस्था करुन कार्यमुक्त करावे. तसेच श्री.रुपेश बळीराम शिंदे,लिपीक टंकलेखक तसेच श्री.जयदत्त इंगोले, लिपीक टंकलेखक यांनी पदभार सोडल्याचा व स्वीकारल्याचा दिनांक त्वरीत शासनास कळवावा. विहीत कालावधीत सबंधित कर्मचारी बदलीच्या ठिकाणी रुजू न झाल्यास, त्याबाबत शासनास त्वरित अवगत करण्यात यावे. जेणेकरुन

सबंधितांविरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई त्वरित करणे शक्य होईल. म.ना.से.(रजा) नियम, १९८१ मधील नियम ३० (सी) नुसार बदली झालेल्या कर्मचाऱ्यांचे रजेचे अर्ज स्वीकारु नयेत/मंजूर करु नयेत.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२११२२९१२३०३८७३०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Santosh Vithal Rokade

Digitally signed by Santosh Vithal Rokade
DN: c=IN, o=Maharashtra State Skill Development Society, ou=eOffice, postalCode=400001, st=Maharashtra, 2.5.4.20=ca5751ffedbb005fdff34ab6ac1f8319d061483d7d35e20f744e251360f7920a, serialNumber=ecf4a9abe84c70de989c3669424c12b6cadcb583d500fe489ce8727916e0bbee, cn=Santosh Vithal Rokade
Date: 2021.12.29 12:31:23 +05'30'

**( सं. वि. रोकडे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. मंत्री, कौशल्य विकास व उद्योजकता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२. मा. राज्यमंत्री, कौशल्य विकास व उद्योजकता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
४. आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता आयुक्तालय, नवी मुंबई
५. संबंधित उप आयुक्त , कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता (कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता आयुक्तालयामार्फत)
६. अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा अधिकारी कार्यालय, मुंबई (कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता आयुक्तालयामार्फत)
७. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी/उप कोषागार अधिकारी (कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता आयुक्तालयामार्फत)
८. संबंधित कर्मचारी (कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता आयुक्तालयामार्फत)
९. निवड नस्ती.